ठाणे व पालघर जिल्हापरिषद व पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणुका-२०१५ करिता त्या क्षेत्रातील दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापनां तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादि आस्थापनांमध्ये कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी भरपगारी सुट्टी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१७/कामगार-९,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २७ जानेवारी,२०१५

वाचा -

१) राज्य निवडणूक आयोगाचे पत्र क्रमांक रानिआ/जिपपंस/२०१४/प्र.क्र.०४/का-७, दि.१२.१.२०१५
२) राज्य निवडणूक आयोगाचे समक्रमांकाचे दि.२३.१.२०१५ चे पत्र.

**शासन परिपत्रक-**

राज्य निवडणूक आयोगाने ठाणे व पालघर जिल्हापरिषद व पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणूका बुधवार, दिनांक २८जानेवारी २०१५ रोजी घेण्याचे ठरविले आहे.

२. भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २४३ झेड ए अन्वये राज्य निवडणूक आयोगावर महानगर पालिकांच्या/ जिल्हा परिषद पंचायत समितीच्या निडणूकांची जबाबदारी सोपविली आहे. मुबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम १४ (४) मधील तरतुदीनुसार निवडणूका शांत, मुक्त व निर्भय वातावरणात घेण्याकरिता निदेश देण्याचे अधिकार राज्य निवडणूक आयोगास आहेत.

३. त्यानुसार ठाणे व पालघर जिल्हयातील जिल्हा परिषद व पंचायत समित्या क्षेत्रातील मतदारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी योग्य संधी प्राप्त करुन देण्याच्या दृष्टीने या क्षेत्रात कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाचा हक्क प्राप्त करुन देण्यासाठी या क्षेत्रात कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी सुट्टी / अथवा कामाच्या तासामधून सवलत देण्याबाबत योग्य

ते आदेश सर्व संबंधितांना तात्काळ देण्याबाबत संदर्भ क्रमांक (१) व (२) येथील पत्रान्वये राज्य निवडणूक आयोगाने कळविले आहे.

४. या पार्श्वभूमीवर पालघर जिल्हयातील जिल्हापरिषद व पंचायत समित्यांच्या संपूर्ण क्षेत्रातील तसेच ठाणे जिल्हयातील पुढे दर्शविलेल्या जिल्हापरिषद व पंचायत समित्यांच्या क्षेत्रातील सर्व दुकाने आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापनां तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादि आस्थापनांना सूचना देण्यात येते की, आपल्या आस्थपनांवरील कामगारांना सदर निवडणूकीचे दिवशी मतदानाचा हक्क बजावण्यासाठी भर पगारी सुट्टी देण्यात यावी .तसेच मतदानाच्या दिवशी अनुपस्थितीमुळे धोका अथवा मोठया प्रमाणावर नुकसान होईल अशा उद्योगातील कामगारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी दोन तासांची विषेश सवलत देण्यात यावी .

**ठाणे जिल्हा परिषद निवडणूक विभागांचा तपशिल :-**

| अ.क्र. | तालुका | निवडणूक विभागाचा क्रमांक व नांव |
|---|---|---|
| १ | शहापूर | ८- आसनगाव<br>१०- नडगाव |
| २ | मुरबाड | १९- शिरवली<br>२०- नारिवली |

**ठाणे पंचायत समिती निर्वाचक गणांचा तपशिल :-**

| अ.क्र. | पंचायत समिती | निर्वाचक गणाचा क्रमांक व नाव |
|---|---|---|
| १ | शहापूर | १६- कळंभे |
| २ | मुरबाड | २७- टोकावडे<br>३२- शिवळे |

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२७१३३११६१११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digambar Sonusing Rajput

Digitally signed by Digambar Sonusing Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Digambar Sonusing Rajput
Date: 2015.01.27 03:18:07 -08'00'

(दि. सो. राजपूत)
उप सचिव (कामगार)

प्रत - उपरोक्त परिपत्रक सर्व संबंधीत आस्थापनांच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह अग्रेषित:-

१.प्रधान सचिव(उद्योग),उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२.कक्ष अधिकारी (कार्यासन-५), राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-३२.
३.कामगार आयुक्त, बांद्रा, मुंबई.
४.संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, बांद्रा, मुंबई.
५.संचालक, बाष्पके, संचालनालय, बांद्रा, मुंबई.
६.संचालक, कै. नारायण मेघाजी लोखंडे, महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, परेल, मुंबई.
७.कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, एलफिन्स्टन रोड, मुंबई.
८.जिल्हाधिकारी, ठाणे,
९.जिल्हाधिकारी, पालघर,
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, ठाणे,
११.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१२.कामगार विभागातील सर्व कार्यासने
१३.निवडनस्ती (कामगार-९)

प्रत माहितीसाठी :-

१.मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंब
२.मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई
३.मा.मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई